**श्री.भरत वना पाटील, रोजंदारी मजूर, तालुका बीजगुणन केंद्र चोपडा, जि.जळगांव यांना शासकीय सेवेत श्रेणी-१, मजूर(वर्ग-४) पदावर कायम करुन वेतनातील फरकाची रक्कम देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि व पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र. न्यायाप्र २०१९/प्र.क्र.६/१३-अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२

दिनांक: ३ मार्च, २०२०

**वाचा:-**

१. आयुक्त(कृषि) कार्यालयाचे पत्र क्र.युएलपी १०१७/प्र.क्र.२३३/भाग-२/आस्था-३, दि.१६.११.२०१९
२. मा. औद्योगिक न्यायालय जळगांव, युएलपी नं.९०५/१९९९ मधील दि.२६.७.२००१ चा न्यायनिर्णय
३. मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, औरंगाबाद रिट पिटीशन क्र. ४८०४/२००१, दि.४.८.२०१६ चा न्यायनिर्णय

**प्रस्तावना:-**

श्री. भरत वना पाटील, ग्रेड-१ मजूर, तालुका बीज गुणन केंद्र, चोपडा, जि. जळगांव यांनी मा. औद्योगिक न्यायालय, जळगांव येथे दाखल केलेला युएलपी क्रमांक ९०५/१९९९ मध्ये प्रकरणाचा न्यायनिर्णय दि.२६.७.२००१ रोजी न्यायनिर्णय होवून त्यांना कायमपणाचे फायदे देऊन वेतनातील फरक अदा करण्याचा निर्णय देण्यात आला. सदर निर्णयाविरुध्द शासनाच्या वतीने मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, औरंगाबाद येथे सिव्हील ॲप्लीकेशन मधील ९६९२/२०१६ मधील रिट पिटीशन क्रमांक ४८०४/२००१ दाखल करण्यात आली होती. त्यात दि.४ ऑगस्ट २०१६ रोजी पुढीलप्रमाणे निर्णय देण्यात आला.

The petitioner- Establishment herein are directed to give to status, privileges and emoluments of permanent employee to the Respondent- Employee (complainant) on the post of Grade-I Majoor with effect from the date on which the first post of /Grade-I Majoor out of the 19 Post has fallen vacant in the light of the communication dated 14.8.2012 and to pay the different of wages to the Respondant (complainant) within a period of 12 weeks from today.

त्यानुसार श्री.भरत वना पाटील यांना प्रथम रिक्त पदाच्या दिनांकानुसार (दि.१.४.२००१ पासून) श्रेणी-१ मजूर(वर्ग-४) पदावर कायम नियुक्तीचे आदेश, सर्व आर्थिक लाभ देय आहेत. श्री. भरत वना पाटील यांना दि.१.४.२००१ पासून दि.२९.२.२०२० या कालावधीत वेतनातील फरकाची रक्कम रु.२३,४५,४४०/-(अक्षरी रुपये तेवीस लाख, पंचेचाळीस हजार, चारशे चाळीस फक्त) अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

मा. उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथील रिट पिटीशन ४८०४/२००१ मध्ये दि.४.८.२०१६ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार श्री. भरत वना पाटील, रा. आखतवाडे, ता.चोपडा, जि. जळगांव यांना प्रथम रिक्त पदाच्या दिनांकानुसार म्हणजे दि.१.४.२००१ पासून श्रेणी-१ मजूर (वर्ग-४) पदावर कायम करण्यात येत असून सर्व अनुषंगिक लाभ मंजूर करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. श्री. भरत वना पाटील यांना दि.**१.४.२००१ पासून दि.२९.२.२०२०** या कालावधीत वेतनातील फरकाची रक्कम रु. २३,४५,४४०/-(अक्षरी रुपये तेवीस लाख, पंचेचाळीस हजार, चारशे चाळीस फक्त) अदा करण्यात येत आहे.

२. शासन निर्णय वित्त विभाग दि.१०.९.२००१ मधील तरतुदीनुसर ६ महिन्यापेक्षा जास्त काळ पद रिक्त राहिल्यास ते आपोआप व्यपगत होते. तथापि कोर्टाचा निर्णय व वित्त विभागाचे अभिप्राय लक्षात घेता दि.१.४.२००१ पासून श्रेणी १ मजूर या संवर्गामध्ये **एक अधिसंख्य पद** निर्माण करण्याच्या अटीवर श्री. भरत वना पाटील यांना दि.१.४.२००१ पासून शासन सेवेत कायम करण्यात येत आहे.

३. न्यायालयीन प्रकरणांत वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ दि.१७ एप्रिल, २०१५ भाग पहिला, उप विभाग-२ अनुक्रमांक २ नियम ७ नुसार भारीत आकस्मिक खर्चास मंजूरी देण्यासाठी त्या नियमामध्ये नमूद अटीच्या अधिन राहून प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सन २०१९-२०२० च्या अर्थसंकल्पीय अनुदानातून लेखाशिर्ष- मागणी क्र.डी-३, २४०१-पीक संवर्धन, १०३ बी बियाणे, (००)(०१)तालुका बीज गुणन प्रक्षेत्र (२४०१-०२६१) , ०१ वेतन या लेखाशिर्षाखाली रु.२३,४५,४४०/-(अक्षरी रुपये तेवीस लाख, पंचेचाळीस हजार, चारशे चाळीस फक्त) खर्च करण्यास व सदर रक्कम कोषागारातून आहरीत व संवितरीत करण्यासाठी उपविभागीय कृषि अधिकारी, अमळनेर, जिल्हा जळगांव यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३१५/२०१९/व्यय-१, दि.२३.१२.२०१९ नुसार प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३०३१०४०४०१४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Ashok Maroti
Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.03.03 10:44:01 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि) , कृषि आयुक्तालय, पुणे

२. कृषि सहसंचालक, (आस्थापना) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, शिवाजीनगर, पुणे

३. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ , (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.

४. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई/नागपूर.
५. विभागीय सहसंचालक, नाशिक विभाग, नाशिक
६. जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, जळगांव.
७. कृषि पर्यवेक्षक तालुका बीज गुणन केद्र, चोपडा, जि. जळगांव
८.उपविभागीय कृषि अधिकारी, अमळनेर, जिल्हा जळगांव
९.सरकारी वकील, मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, औरंगाबाद यांना रिट पिटीशन क्र.४८०४/२००१ व मा. औद्योगिक न्यायालय, जळगांव येथील युएलपी क्र. ९०५/१९९९ च्या संदर्भात अग्रेषित.
१०. कक्ष अधिकारी, २ अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. श्री. भरत वना पाटील, मजूर, तालुका बीज गुणन केंद्र, ता. चोपडा, जि. जळगांव
१२. निवडनस्ती १३ अे